अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारित नसलेल्या तथापि महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या अखत्यारीत असलेल्या शासन मान्य संस्थेतील (NON AICTE) अभ्यासक्रम बंद करुन अनामत रक्कम परत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मान्यता-२०१८/(प्र.क्र.२०९/१८)/तांशि-५,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.**
**दिनांक : ०७ नोव्हेंबर, २०१९.**

वाचा :-

१. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.मरातंशिमं/का-५३/२०१८/२८१०, दिनांक १६.०४.२०१८.
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.मरातंशिमं/का-५३/अल्पमुदतठेवी २०१९/३४, दिनांक २२.०२.२०१९.
३. शासन निर्णय क्रमांक मान्यता-२००६/(१६२/०६)/तांशि-६, दिनांक ६ ऑक्टोबर, २००६.

प्रस्तावना:-

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारीत नसलेल्या तथापि महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या अखत्यारीत असलेल्या शासनमान्य स्व.गोपालराव गावंडे बहुउद्देशीय, विडी, ता.देऊळी, जि.वर्धा चे विदर्भ इंन्स्टिटयूट ऑफ टेक्नालॉजी, काटोल, जि.नागपूर, संस्था क्र. ०८१६ या संस्थेस (NON AICTE) विविध अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी शासन निर्णय क्र.मान्यता-२००६/(१६२/०६)/तांशि-६, दिनांक ६ ऑक्टोबर, २००६ अन्वये शासन मान्यता देण्यात आलेली आहे. तथापी सदर संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडे केलेल्या विनंतीस अनुसरून मंडळाने शासनास सदर संस्था बंद करुन अभ्यासक्रमाकरीता जमा केलेली नियत ठेव संस्थेच्या खाती जमा करण्यास वरील अ.क्र. १ व २ येथील पत्रांन्वये प्रस्तावित केलेले आहे.

शासन निर्णय :-

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारीत नसलेल्या तथापि महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाच्या अखत्यारीत असलेल्या खालील तक्त्यातील नमूद संस्थांचे अभ्यासक्रम बंद करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेने नाव व पत्ता | अभ्यासक्रम | प्रवेशक्षमता |
|---|---|---|---|
| १ | स्व.गोपालराव गावंडे बहुउद्देशीय सेवा संस्था, विडी, ता.देऊळी, जि.वर्धा चे विदर्भ इंन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, काटोल, जि.नागपूर (DTE-४३५०, MSBTE-०८१६) | डिप्लोमा इन ड्रेस डिझायनिंग ॲण्ड मॅन्युफॅक्चरींग (पूर्ण वेळ) | ६० |
| | | ॲडव्हान्स डिप्लोमा इन आयटी (पूर्ण वेळ) | ६० |

१) या संस्थेतील बंद करावयाच्या अभ्यासकमांच्या संबंधित सर्व दस्तऐवज जसे की गुणपत्रिका, उत्तरपत्रिका, निकालपत्रे, विद्यार्थ्यांचे पत्ते, फीच्या पावत्या इत्यादी बाबी संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाकडे सुपूर्द करणे आवश्यक राहील.

२) संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त शिक्षक वर्ग/कर्मचारी यांच्या सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेली सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील. भविष्यकाळात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

३) संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापी थकबाकी असल्यास किंवा भविष्यात शासनास संस्थेला काही देणी निर्माण झाल्यास त्याचा तात्काळ शासनाकडे भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

४) संस्थेमध्ये सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेविषयी संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतलेले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

५) संस्थेतील संबंधित अभ्यासक्रम बंद केल्यानंतर त्या संस्थेतील प्रवेशीत विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना परीक्षेस बसण्याची इच्छा असल्यास त्याची पर्यायी व्यवस्था करणे संस्थांवर बंधनकारक राहील.

६) संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त केलेल्या संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक प्रदानाचे भुगतान करणे संस्थेस बंधनकारक राहील.

७) संबंधित संस्थांनी उपरोक्त अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी शासनाकडे जमा केलेली नियत ठेव संस्थेच्या खाती वर्ग करण्याची पुढील कार्यवाही मंडळामार्फत करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११०७१५१७१४७५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2019.11.07 15:20:39 +05'30'

**(अ.र.काटकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे (पू), मुंबई-५१.
३) महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, विभागीय कार्यालय, नागपूर(महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांचेमार्फत)
४) संबंधित संस्था (महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांचेमार्फत),
५) निवड नस्ती / तांशि-५.